महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती अधिनियम, २०२२ मधील तरतुदींनुसार उप जिल्हाधिकारी संवर्गातील ०२ उमेदवारांच्या नियुक्तीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. नियुक्ती-०९२२/प्र.क्र.१५३/ई-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २१ ऑगस्ट, २०२३

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१४/प्र.क्र.७/१४/१८-ब, दि.२४.०४.२०१५
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-१११४/प्र.क्र.८३/१४/१८-ब, दि.०३.११.२०१४
४) महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती अधिनियम, २०२२
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-११२२/प्र.क्र.१२८/१६-ब, दि.२१.०९.२०२२
६) सामान्य प्रशासन विभागाचे क्र. टिआरएन-१०२२/प्र.क्र.१०१/सीपीटीपी, दि.२०.१०.२०२२
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-११२२/प्र.क्र.१२८/१६-ब, दि.३१.०१.२०२३
८) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र. नियुक्ती-०९२२/प्र.क्र.१५३/ई-२, दि.२७.०९.२०२२
९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.इएसटी-२०२२/प्र.क्र.१३८/ई-८, दि.२७.०९.२०२२

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती अधिनियम, २०२२ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.०९.२०२२ मधील तरतुदींनुसार शासन आदेश, महसूल व वन विभाग, दि.२७.०९.२०२२ अन्वये उप जिल्हाधिकारी संवर्गातील ०३ उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्यापैकी, श्रीमती पर्वणी रविंद्र पाटील यांची राज्यसेवा परीक्षा-२०१७ मधून नियमित उप जिल्हाधिकारी पदावर नियुक्ती झालेली असल्यामुळे त्यांनी राज्यसेवा परीक्षा-२०१९ मधून उप जिल्हाधिकारी पदासाठी “Opting out” या पर्यायाची निवड केली आहे. श्रीमती पर्वणी रविंद्र पाटील यांची अधिसंख्य पदावर नियुक्ती करण्याची आवश्यकता नसल्याचे विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांनी दि.३०.१२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. सबब, संदर्भाधीन क्र.८ येथील आदेशान्वये श्रीमती पर्वणी रविंद्र पाटील यांची अधिसंख्य पदावर करण्यात आलेली नियुक्ती रद्द करण्यात येत आहे.

२. त्यानुषंगाने, संदर्भाधीन क्र.१) ते ७) मधील तरतूदीन्वये, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत अधिका-यांच्या परिविक्षाधीन कालावधीमध्ये राबविण्यात येणा-या प्रशिक्षण धोरणानुसार श्री. लक्ष्मण महादेव कसेकर व श्री. अरुण बाळासो पाटील यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यातील प्रशिक्षणासाठी खालीलप्रमाणे जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन उप जिल्हाधिका-यांचे नाव | प्रशिक्षणासाठी जिल्हा | |
|---|---|---|---|
| | | प्रस्तावित जिल्हा | विभाग |
| १. | श्री. लक्ष्मण महादेव कसेकर | सिंधुदुर्ग | कोकण-१ |
| २. | श्री. अरुण बाळासो पाटील | नाशिक | नाशिक |

३. उक्त नमूद अधिका-यांना परिविक्षाधीन अधिकारी म्हणून खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात येत आहे:-

(१) एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाचा दोन वर्षांचा कालावधी हा उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी राहील.

(२) उमेदवाराने रुजू होताना दिलेल्या रु.५ लाख (रूपये पाच लाख) रक्कमेच्या बंधपत्रातील तरतूदी त्याच्यावर बंधनकारक असतील.

(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.०७.२०१७ अन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत राबवण्यात येणारा दोन वर्षाचा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम (Master of Arts in Development Administration-M.A.(D.Adm) with Specialization) विहित केलेल्या अर्हता गुणांसह उत्तीर्ण करणे उमेदवारास बंधनकारक असेल.

(४) पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या अनुषंगाने शासन, यशदा व मुंबई विद्यापीठ यांचेकडून वेळोवेळी दिलेल्या सूचना/ नियम/ आदेश/ निर्णय संबंधित उमेदवारावर बंधनकारक राहतील.

(५) पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमानुसार चारही सत्रांच्या परीक्षा विहित संधी/ कालावधीत उत्तीर्ण होणे बंधनकारक राहील. तसेच सर्व टप्प्यांचे प्रशिक्षणही दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीत पूर्ण करणे बंधनकारक राहील.

(६) उमेदवारांनी दोन वर्षांचा परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करणे व या कालावधीत त्यांची वर्तणूक समाधानकारक व त्यांच्या पदाला अनुरुप असणे आवश्यक राहील. त्यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण न केल्यास किंवा त्यांची वर्तणूक समाधानकारक व त्यांच्या पदाला अनुरुप नसल्याचे तसेच परिवीक्षाधीन पदावरील गैरवर्तणुकीची/ गैरव्यवहाराची बाब निदर्शनास आल्यास अथवा इतर कारणांमुळे ते या पदासाठी योग्य नसल्याचे आढळून आल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

(७) या पदावरील नियुक्तीपूर्वी शासन सेवेत कार्यरत असल्यास व त्या पदावरील गैरवर्तणूकीची/ गैरव्यवहाराची बाब परिविक्षाधीन कालावधीत निदर्शनास आल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांची परिवीक्षाधीन पदावरील नियुक्ती समाप्त करण्यात येईल.

(८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), दि.३०.०७.२०१९ अन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम उत्तीर्ण झालेल्या अधिकाऱ्यांना

संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण असल्याचे समजण्यात येईल व अशा अधिकाऱ्यांना पुन्हा संगणक अर्हता परीक्षा प्रमाणपत्र सादर करण्याची आवश्यकता असणार नाही.

(९) उमेदवारांना मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास एतदर्थ मंडळाची मराठी व हिंदी भाषा परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण करणे आवश्यक राहील.

(१०) उमेदवारांना "नवीन निवृत्तीवेतन योजना" (New Pension Scheme) लागू राहील.

(११) एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीत नैमित्तिक रजांव्यतिरिक्त कोणत्याही प्रकारची रजा अनुज्ञेय नाहीत. परिविक्षाधीन अधिकारी अनाधिकृतरित्या गैरहजर राहिल्यास किंवा वैद्यकीय कारणाच्या सबबीखाली राज्य लोकसेवा/ केंद्रीय लोकसेवा परीक्षांची तयारी/ परीक्षा देत असल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्याची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

(१२) उपरोक्त अटींव्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिकाऱ्यांना लागू असलेल्या सर्व महाराष्ट्र नागरी सेवा नियमांचे व इतर सेवाविषयक सर्वसाधारण नियमांचे तसेच यापुढे शासन वेळोवेळी निश्चित करेल त्या अटी/ आदेशांचे पालन करणे उमेदवारांना बंधनकारक राहील.

(१३) संबंधित उमेदवार हा सेवा प्रवेश नियमानुसार सेवेस पात्र नसल्याचे किंवा मूळ नियुक्तीसाठी खोटी कागदपत्रे किंवा खोटी प्रमाणपत्रे या आधारे शासन सेवेत रुजू झाल्याचे, शासकीय सेवेत कोणत्याही वेळी सिद्ध झाल्यास, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सिडिआर-१०९३/१०७७/प्र. क्र.२३/१३/बकतु, दि.१२.१०.१९९३ नुसार त्याला सेवेतून काढून टाकण्याची/ सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात येईल.

(१४) उमेदवारांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत प्रशिक्षण पूर्ण करणे अनिवार्य असेल. सदर प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये प्रशिक्षण घेणा-या अधिकाऱ्यांचे परिवीक्षाधीन प्रशिक्षण, परिवीक्षाधीन कालावधी, सेवाज्येष्ठता, विभागीय परीक्षा तसेच अन्य अनुषंगिक बाबींसाठी सामान्य प्रशासन विभागाच्या सीपीटीपी (प्रशिक्षण) कार्यासनामार्फत विविध शासन निर्णय, शासन परिपत्रके, नियम व अधिसूचना इत्यादीद्वारे वेळोवेळी विहित करण्यात आलेल्या तरतूदी लागू राहतील. उपरोक्तप्रमाणे नियुक्त होणारी व्यक्ती शिफारसप्राप्त पदासाठी अयोग्य असल्याचे आढळले तर, ती सेवा समाप्त केली जाण्यास पात्र ठरेल.

(१५) उक्त उमेदवारांना नियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी कोणत्याही प्रकारचा प्रवास भत्ता देय असणार नाही.

(१६) सदर उमेदवारास विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमास (सीपीटीपी) आवश्यक त्या कागदपत्रांसह उपस्थित राहण्याबाबत यथावकाश कळविण्यात येईल.

४. संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांचा विविध विभागांतर्गत खातेनिहाय जिल्हा संलग्न प्रशिक्षण कार्यक्रम सामान्य प्रशासन विभागाच्या धोरणानुसार परिविक्षाधीन उप

जिल्हाधिकारी रुजू झाल्यापासून तात्काळ तयार करावा व त्याची प्रत परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन द्यावी.

५. परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांनी दैनंदिन रोजनिशी दररोज न चुकता ई-मेलद्वारे संबंधित जिल्ह्यातील निवासी उप जिल्हाधिकारी व संपर्क/ समन्वय अधिकारी, उपायुक्त (महसूल) यांना सादर करावी.

६. विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांनी प्रशिक्षणार्थीवर प्रत्यक्ष नियंत्रण ठेवावे. तसेच, प्रशिक्षणार्थीवर प्रत्येक महिन्यात केलेल्या कामकाजांचे मूल्यमापन व अनुभवाच्या आधारावर मासिक अहवाल घ्यावा व सदर अहवालाचे मूल्यमापन करावे. प्रत्येक महिन्यात याचा अहवाल प्रमाणित करून सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावा.

७. परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांच्या दैनंदिन उपस्थिती/ अनुपस्थिती/ वर्तन इ. बाबत संबंधित जिल्ह्यातील जिल्हाधिकारी यांनी समन्वय अधिकारी, उपायुक्त (महसूल) यांना अहवाल सादर करावा.

८. प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थीने गैरवर्तन केल्याचे अथवा प्रशिक्षण पुरेशा गांभीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास अशा घटना त्वरित संबंधित जिल्हाधिकारी यांनी समन्वय अधिकारी, उपायुक्त (महसूल) यांच्याशी संपर्क साधून निदर्शनास आणून देण्यात याव्यात. तसेच, या संबंधित अहवाल समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांनी शासनाच्या महसूल व वन विभाग व सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

९. सदर परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांच्या वेतनासाठी शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.इएसटी-२०२२/प्र.क्र.१३८/ई-८, दि.२७.०९.२०२२ अन्वये अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. प्रशिक्षणार्थींना वाटप केलेल्या विभागातील परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांचे वेतन व भत्ते संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत सदर पदांवर अदा करण्यात येतील.

१०. खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या परीक्षा प्रशिक्षणार्थींनी विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच, प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

११. विभागीय प्रशिक्षणाच्या टप्प्यामध्ये परिविक्षाधीन उप जिल्हाधिकाऱ्यांचे मूल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१११४/प्र.क्र.८४/१८-ब, दि.२२.०४.२०१५ मधील निर्देशानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांची राहील.

१२. शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.०४१५/प्र.क्र.१२२/ई-२, दि.१५.०९.२०१५ नुसार परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना वाटप केलेल्या विभागातील समन्वय अधिकारी म्हणून उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय यांची नेमणूक करण्यात आली आहे. त्यानुसार समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांनी प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी योग्य ती दक्षता घ्यावी.

१३. परिविक्षाधीन उप जिल्हाधिकाऱ्यांना केवळ प्रशिक्षणासाठीच जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

१४. परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांनी त्यांना प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या जिल्ह्यात शासन आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात म्हणजेच दि.२०.०९.२०२३ (म.पू.) पर्यंत रुजू व्हावे व तसा अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा. संबंधित उमेदवार विहित वेळेत रुजू न झाल्यास नियमानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

१५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८२११७०९२१७६१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURESH DATTATRAY NAIK

Digitally signed by SURESH DATTATRAY NAIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=850d803882a7cf083f80e9f3e97bd648dfbbee a0f79d5c58464988f98099e530, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=842E7F01AD6007A0F84ABAB1D0F7812 EBD23BBE62268DE19A63EA2372DE520A4, cn=SURESH DATTATRAY NAIK
Date: 2023.08.21 17:12:51 +05'30'

**(सुरेश नाईक)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) सर्व विभागीय आयुक्त.
४) सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
५) उप सचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) संबंधित प्रशिक्षणार्थी.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- सह सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-२).